# : यंत्र :

यंत्र हे देवतेचे अंतिमस्वरूप समजले जाते. 'देवतात्मकं हि यंत्रम्' ह्या वचनानुसार यंत्र हे देवतास्वरूप असते. ज्या देवतेची मूर्ती नसते पण तिची पूजा करावयाची असते, अशावेळी मूर्ती अगर प्रतिमेच्या ऐवजी त्या देवतेच्या यंत्राची स्थापना केली जाते. मूर्ति स्थापनेने जे फल प्राप्त होते तेच फल यंत्र स्थापनेनेही प्राप्त होते. यंत्रामध्ये मूळ बीजाचे आवाहन केलेले असते व त्यायोगे देवतेच्या मूळ स्वरूपाचेच आवाहन केल्या सारखे होते. देवता ह्या मंत्ररूप, बीजरूप असतात. बीजमंत्राने अथवा नाममंत्राने देवतांचे आवाहन त्या यंत्रामध्ये केले जाते, "यंत्र" या धातूचा अर्थ निबद्ध होणे असा होतो. यंत्राद्वारा त्या यंत्राची देवता खिळवून टाकणे, बांधून टाकणे ही कार्ये साधली जातात.

यंत्र तयार करताना त्यासाठी निरनिराळ्या धातूंचा वापर करतात. सोने, रुपे, चांदी व तांबे हे चार महत्वाचे धातू यंत्रासाठी उपयोगात आणतात. कांही यंत्रे निरनिराळ्या धातूंच्या मिश्रणानेही तयार करतात. काही वेळा लाकडावर अगर दगडावर कोरूनही यंत्रे तयार करतात व त्यावर मूर्तिची प्राणप्रतिष्ठा करतात.

शास्त्रमर्यादेने सांगितलेल्या आकारात व प्रकारात यंत्र तयार झाल्यावर ते सिद्ध करावे लागते. यंत्र सिद्ध करण्याचाही विधि

असतो. यंत्र तयार होत असता जे कांही दोष शिल्लक राहतात ते नष्ट करण्यासाठी प्रथम 'अग्न्युत्तारण विधी' करावा लागतो आणि मगच ते यंत्र सिद्ध करावे लागते.

यंत्राची रचना बिंदु, त्रिकोण, षटकोन, वर्तुळ किंवा अष्टदल यास्वरूपात करतात. यंत्राच्या मध्यभागी ज्या देवतेची स्थापना करावयाची असेल त्या देवतेची बीजाक्षरे लिहितात. देवतेची बीजे, बीजाक्षरे ही त्या देवतेची सूक्ष्मरूपाने साकारलेली रूपेच समजली जातात.

ज्याप्रमाणे 'गं' हे बीजाक्षर गणपतीचे त्याचप्रमाणे ऐं, र्‍हीं, क्लीं ही बीजाक्षरे अनुक्रमे महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती ह्यांची होत. ही बीजाक्षरे म्हणजेच बीजमत्र होत. ह्या बीजाक्षर मंत्रात त्या देवतेचा वास असतो ( अस्तित्व असते ) असा मंत्रशास्त्राचा सिद्धांत आहे. यावरुन यंत्राचे महत्व फार मोठे आहे हे लक्षात येते.

यंत्र हे रेशमी वस्त्रावर काढावे. त्याचा रंग सौभाग्य वर्धक असावा. यंत्र काढण्यास कुंकू, कस्तुरी किंवा चंदन यापैकी एकाचा वापर करावा रेशमी वस्त्र नसल्यास तांबुस रंगाचे कापड वापरावे.

यंत्राच्या मध्यभागी मूळ बीज लिहावे. सर्वसाधारणपणे यंत्राची रचना एक सारखीच असली तरी ज्या विधानाने उपासना करावयाचो असेल त्याचेच बीज लिहिणे उत्तम. बीजाक्षरे लिहिल्यानंतर त्यावर आवरण देवतांची स्थापना करावी लागते. ही आवरणे नऊ पर्यंत असतात. यंत्राला चतुर्द्वार असते.

यंत्र काढून झाल्यावर त्यावर त्या देवतेची प्राणप्रतिष्ठा करावी, म्हणजे ते यंत्र त्या देवतेचे बनते. यंत्र सिद्ध करण्याठी ॐ काराचा पंधरा वेळा उच्चार करावा म्हणजे ते यंत्र सिद्ध होते. स्फटिकादि धातूंची यंत्रे ही पूर्वप्रतिष्ठित म्हणजे स्वयंभू असतात त्यामुळे त्यांची प्राणप्रतिष्ठा करण्याची गरज नाही.

सिद्ध झालेल्या यंत्राची शास्त्रोक्त पद्धतीने उपासना केली असता त्या यंत्राची देवता सिद्ध होते. मग ह्या सिद्ध झालेल्या यंत्राद्वारा म्हणजेच देवतेद्वारा आपले इप्सित साध्य करून घेता येते. ज्या उद्देशाने यंत्रपूजा केली जाते त्यानुसार उपासनेत फरक पडतो. शुद्ध हेतुसाठी केलेली उपासना योग्य पथ दर्शविणारी ठरते तर जारण-मारणादि सारख्या अनिष्ट गोष्टीसाठी केल्यास अंती ते यंत्रपूजा करणाऱ्याला घातक ठरते, तेंव्हा असल्या अनिष्ट गोष्टी न करणेच हितावह होय. काही यंत्राच्या केवळ दर्शनानेही फलप्राप्ति होते.

धर्मशास्त्रांच्या मर्यादा सांभाळून जो उपासक उपासना करेल त्याने बीजरूपात्मक, सावरण, यथाशास्त्र सिद्ध केलेल्या यंत्राची पूजा करावी त्यातच त्याचे खरे हीत आहे.

गौरीयामलात चार प्रकारची यंत्रे सागितली आहेत, ती अशी भूपृष्ठ, कूर्मपृष्ठ, पद्मपृष्ठ व मेरुपृष्ठ. भूपृष्ठावरील रेषा नालीप्रमाणे खोल असतात व कूर्मपृष्ठ व पद्मपृष्ठ ही यंत्रे उर्ध्वरेखामय असतात.

यंत्राच्या धातुंच्या वजनासंबंधीसुद्धा शास्त्रात नियम घालून दिलेले आढळतात. शास्त्रशुद्ध वजन नसल्यास उपासनेत अडथळे, संकटे त्रास देतात असे म्हणतात. * *

# श्री गणेश यंत्र

१



# श्री गणेश यंत्र

२



# स्तोत्रे, आरत्या व भूपाळ्या

## मंगलाचरणम्

श्रीगणेशाय नमः। श्रीगुरुभ्यो नमः।। स जयति सिंदुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणम्। वासरमणिरिव तमसां राशीन्नाशयति विघ्नानाम्।। १ ॥ सुमुखश्चैकदंतश्च कपिलो गजकर्णकः। लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ।। २ ॥ धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजाननः। द्वादशैतानि नामानि यः पठेच्छृणुयादपि ॥ ३ ॥ विद्यारम्भे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा। संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥ ४ ।। शुक्लांबरधरंदेवं शशिवर्णं चतुर्भुजम्। प्रसन्नवदनं ध्यायेत् सर्वविघ्नोपशान्तये ॥ ५ ॥

## * मुग्दल पुराणात सांगितलेला गणेशन्यास *

श्रीगणेशाय नमः॥ आचम्य प्राणायामं कृत्वा। दक्षिणहस्ते वक्रतुंडाय नमः। वामहस्ते शूर्पकर्णाय नमः। ओष्ठे विघ्नेशाय नमः सम्पुटे गजाननाय नमः। शिरसि एकदंताय नमः। चिबुके ब्रह्मणस्पतये नमः। दक्षिणनासिकायां विनायकाय नमः। वामनासिकायां ज्येष्ठराजाय नमः। दक्षिणनेत्रे विकटाय नमः। वामनेत्रे कपिलाय

नम:। दक्षिणकर्णे धरणीधराय नम:। वामकर्णे आशापूरकाय नम:। नाभौ महोदराय नम:। हृदये धूम्रकेतवे नम:। ललाटे मयूरेशाय नम:। दक्षिणबाहौ स्वानंदवासकारकाय नम:। वामबाहौ सच्चित्सुख-धाम्ने नम:। इति मुद्गलपुराणे गणेशन्यास: समाप्त:॥

## * संकटनाशन गणेशस्तोत्रम् *

श्रीगणेशाय नम:। नारद उवाच॥ प्रणम्य शिरसादेवं गौरीपुत्रम् विनायकम्॥ भक्तावास स्मरेनित्यमायु:कामार्थ सिद्धये॥ १॥ प्रथमं वक्रतुंडं च एकदन्तं द्वितियकम्॥ तृतीयं कृष्णपिंगाक्षं गजवक्त्रं चतुर्थतकम्॥२॥ लंबोदरं पंचमं च षष्ठं विकटमेव च॥ सप्तमं विघ्नराजेंद्रं धूम्रवर्णं तथाष्टमम्॥ ३॥ नवमं भालचंद्रं च दशम तु विनायकम्। एकादशं गणपतिं द्वादशं तु गजाननम्॥ ४॥ द्वादसैतानि नामानि त्रिसंध्यं य: पठेन्नर:॥ न च विघ्नभयं तस्य सर्वसिद्धिकरं परम्॥ ५॥ विद्यार्थी लभते विद्यां धनार्थी लभते धनम्॥ पुत्रार्थी लभते पुत्रान्मोक्षार्थी लभते गतिम्॥ ६॥ जपेद्गणपतिस्तोत्रं षड्भिर्मासै: फलं लभेत्॥ संवत्सरेण सिद्धिं च लभते नात्र संशय:॥७॥ अष्टभ्यो ब्राह्मणेभ्यश्च लिखित्वा य: समर्पयेत्॥ तस्य विद्या भवेत्सर्वा गणेशस्य प्रसादत:॥८॥ इति नारदपुराणे संकटनाशनं नाम गणेशस्तोत्रं संपूर्णम्।

# भूपाळ्या

## रामानंदकृत

उठा उठा हो सकळिक । वाचे स्मरावा गजमुख । ऋद्धिसिद्धिचा नायक । सुखदायक भक्तांसी ॥ धृ. ॥ अंगी शेंदुराची उटी । माथां शोभतसे कीरिटी । केशर कस्तुरी लल्लाटी । हार कंठी साजिरा ॥१॥ कानी कुंडलांची प्रभा । सूर्य–चंद्र जैसे नभा । माजी नागबंदी शोभा । स्मरतां उभा जवळी तो ॥ २ ॥ कासे पितांबराची धटी । हाती मोदकांची वाटी । रामानंद स्मरता कंठी । तो संकटी पावतो ॥ ३ ॥

## गणपतीपुळे येथे म्हटली जाणारी भूपाळी

पहांट झाली वाजुं लागला मंजुळ हा चौघडा ।। मोरया ।। उठा उठा हो उठा मोरया नेत्रांते उघडा ।। धृ. ।। उठावयाची वेळ सुचवितो आरवुनी कोंबडा ।। मोरया ।। संमार्जन करुनी घालुं लागल्या द्वारीं युवती सडा ।। १ ।। अंधारहि हा पहा भीतीने मारु लागला दडा ।। मोरया ।। होईल म्हणतो मनीं भानुचा अंमल सुरु करडा ।। २ ।। द्वारि टाकिला असे सुगंधी सुंदर चंदन सडा ।। मोरया ।। शुद्ध जलाने नाभितीर्थिचा भरुनी आणिला घडा ।। ३ ।। नैवेद्याला मोदक, लाडू, लोणी, साखर खडा ।। मोरया ।। सर्व सिद्धता करुनि

पूजना द्वारि राहिलो खडा ।। ४ ।। निराकार परि ॐकाराकृति काढुनि मग शुंडा ।। मोरया ।। करोनि पूजा करिन प्रार्थना दुर्मति मम खंडा ।। ५ ।। कार्यनाशकर विघ्ने गांजिति दूर तया दवडा ।। मोरया ।। नष्ट करा हो फोडून टाकुनि सत्वर दुरित खडा ।। ६ ।। 'पुळ्यात' कितितरि भक्त तारिले मीच काय वावडा ।। मोरया ।। 'दीनदयाघन' ब्रीद व्यर्थ हे अपुले नच दवडा ।। ७ ।।

# आरत्या

## श्रीस्वामी समर्थ रामदासकृत

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।। सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची । कंठी झळके माळ मुक्ताफळाची ॥१॥ जय देव जय देव जय मंगलमूर्ति । दर्शनमात्रे मन कामना पुरती।। जय देव जय देव।। रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा । चंदनाची उटी कुंकुमकेशरा ।। हिरेजडित मुकुट शोभतो बरा । रुणझुणती नुपुरे चरणी घागरिया ।। जय. ।। २ ।। लबोदर पीतांबर फणिवर वंदना । सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ।। दास रामाचा वाट पाहे सदना । संकटी पावावें, निर्वाणी रक्षावे, सुरवरवंदना ।। जय. ।। ३ ।।

## मुक्तेश्वरकृत

प्रसन्नमाळा विमळा करिं घेऊन कमळा । उंदिर वाहन दोंदिल नाचसि बहुलीळा । रुणझुण रुणझुण करिती घागरिया घोळा । सताल सुस्वर गायन शोभित अवलीळा ।। जय देव जय देव जय वक्रतुंडा । सिंदुरमंडित विशाल सरळ भुजदंडा ।। जय १ ।। सा री ग म प ध नी सप्तस्वर भेदा । धिमकिट धिमकिट मृदुंग वाजति गतिछंदा ।। तातक तातक थय्या करिसी आनंदा । ब्रह्मादिक अवलोकिती तव पदारविंदा ।। जय. ।। २ ।। अभयवरदा सुखदा राजिवदलनयना । परशांकुश लड्डूधर शोभित शुभरदना ।। उर्ध्व-दोंदील उंदिर कार्तिकेश्वर रचना । मुक्तेश्वर चरणांबुजि अलिपरि करि भ्रमणा ।। जय. ।। ३ ।।

( समाप्त )